**दिनांक २४ एप्रिल " पंचायत राज दिवस" आणि दिनांक २४ एप्रिल ते १ मे हा "पंचायत राज सप्ताह" म्हणून दरवर्षी साजरा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन परिपत्रक क्रमांक :झेडपीए २०११/३८१/प्र.क्र.४७ /पंरा-१

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक ६ एप्रिल , २०११.

वाचा :-.१. क्रमांक व्हीपीएम २००९/प्र.क्र.२२७/पंरा-३,दिनांक २५ जानेवारी, २०१०

२. क्रमांक व्हीपीएम २००९/प्र.क्र.२२७/पंरा-३,दिनांक ११ मार्च, २०१०

**प्रस्तावना :-**

दिनांक २४ एप्रिल हा दिवस पंचायत राज संस्थांच्या इतिहासातील महत्वाचा दिवस आहे. कारण या दिवशी १९९३ साली महामहीम राष्ट्रपती महोदयानी संसदेने संमत केलेल्या ७३ व्या घटना दुरुस्तीला संमती दिली होती. त्यामुळे पंचायत राज संस्थांना घटनात्मक स्थान प्राप्त झाले. लोकशाही विकेंद्रीकरणासाठी ७३ वी घटना दुरुस्ती हे एक महत्वाचे पाऊल ठरले आहे.

२. देशाचा खऱ्या अर्थाने विकास होण्यासाठी पंचायत राज संस्था मजबूत असणे आवश्यक आहे. यास्तव पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी दिनांक २४ एप्रिल हा दिवस दरवर्षी पंचायत राज दिवस म्हणून साजरा करण्याबाबत सूचना दिल्या आहेत. या निमित्ताने विविध उपक्रम, कार्यशाळा, व कार्यक्रमाचे ग्राम पातळीवर, तालुका पातळीवर, व जिल्हा पातळीवर आयोजन करावयाचे असून या निमित्ताने ग्रामसभांचेही आयोजन करावयाचे आहे.

**परिपत्रक** :-

दिनांक २४ एप्रिल हा दिवस दरवर्षी पंचायत राज दिवस म्हणून साजरा व्हावा तसेच दिनांक २४ एप्रिल ते १ मे हा पंचायत राज सप्ताह म्हणून साजरा व्हावा. दिनांक १ मे, २०११ रोजी पंचायत राज संस्था सुवर्ण महोत्सवी वर्षात पदार्पण करीत असल्याने यावर्षी " पंचायत राज सप्ताह" वैशिष्टपूर्ण विविध उपक्रमाने साजरा करण्यात यावा. या निमित्ताने वक्तृत्व, निबंध स्पर्धा, रॅली, प्रशिक्षण, कार्यशाळा यांचे उत्तम रितीने आयोजन व्हावे यासाठी या परिपत्रकान्वये पुढील प्रमाणे सविस्तर सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**अ. कार्यशाळांचे आयोजन :-**

या दिवशी व सप्ताहात वक्तृत्व स्पर्धा, निबंध स्पर्धा, परिसंवाद, चर्चासत्र, प्रशिक्षण यांचे जिल्हा व तालुका पातळीवर आयोजन करण्यात यावे. जिल्हा पातळीवरील कार्यशाळेचे आयोजन मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी करावे. याच पध्दतीचे आयोजन तालुका पातळीवर गट विकास अधिकारी यांनी

करावयाचे आहे या कार्यशाळेत पंचायत राज, पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजना, ग्रामसभा बळकटीकरण, वृक्ष लागवड या विषयावर चर्चा घडवून आणावी.

**ब. ग्रामसभांचे आयोजन :-**

पंचायत राज दिवस (२४ एप्रिल) ते महाराष्ट्र दिन (१ मे) या कालावधीत ग्रामसभा घेण्याबाबत शासन परिपत्रक क्रमांक व्हीपीएम २००९/प्र.क्र.२२७/पंरा-३, दिनांक २५ जानेवारी, २०१० चे अनुपालन करावे. यापूर्वी प्रत्येक कुटूंबात ग्रामसभेचे महत्व पटवून देण्यासाठी जनजागृती कार्यक्रम हाती घ्यावा. प्रत्येक कटूंबात ग्रामसभेचे महत्व पटवून देणारी घडीपत्रिका देण्यात यावी.

२. पंचायत राज दिवस साजरा करण्यासाठी विविध प्रसारमाध्यमातून या उपक्रमास व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

३. पंचायत राज दिवस साजरा करण्याचा मुख्य उद्देश लोकशाही ग्रामपातळीपर्यंत पोहचविणे हा आहे. यास्तव पंचायत राज दिवस साजरा करण्याबाबत विभागीय आयुक्त व जिल्हा परिषदांनी सर्वतोपरी प्रयत्न करावे.

४. हा शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४०६२२३६२४००१ असा आहे.

(डॉ. मल्लीनाथ कलशेट्टी )
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१. मा. अध्यक्ष जिल्हा परिषद (सर्व), (मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मार्फत).
२. मा. विधानसभा/ मा. विधानपरिषद सदस्य (सर्व).
३. मा. मुख्य सचिव.
४. मा. अप्पर मुख्य सचिव.
५. मा. प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग.
६. विभागीय आयुक्त सर्व.
७. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधनी, पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व).
९. प्राचार्य, सर्व पंचायत राज प्रशिक्षण केंद्र/ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र.
१०. मा. मंत्री ग्राम विकास यांचे खाजगी सचिव.
११. मा. राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव.
१२. सर्व उप सचिव (ग्राम विकास विभाग).
१३. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) जिल्हा परिषद सर्व. (मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मार्फत).
१४. गट विकास अधिकारी (सर्व) (मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मार्फत).
१५. निवड नस्ती (पंरा-१).